**डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती सहायक अनुदान सन २०२५-२६ (अनिवार्य) (पहिला हप्ता)**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : विप्रप्र-२०२५/प्र.क्र.३२/प्रशि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १५ एप्रिल, २०२५

**वाचा :-** (१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र., अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थसंकल्प-३, दि. ०१.०४.२०२४.
(२) संचालक, डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती. यांचे पत्र क्र. प्रशा/लेखा-व.लि./कावि/२३१/२०२५, दिनांक ०१.०४.२०२५.

**प्रस्तावना :-**

डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस सन २०२५-२६ या वित्तीय वर्षाकरीता मागणी क्र : ए-४, प्रधान लेखाशीर्ष २०७०, सहायक अनुदान (अनिवार्य) (२०७० ०७५५) याखाली ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) करिता रु. १४.७० लाख तसेच ३६ सहायक अनुदाने (वेतन) करिता रुपये २२१.१० लाख असे एकूण रुपये २३५.८० लाख (रुपये दोन पस्तीस लाख ऐंशी हजार फक्त) इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आली आहे. संदर्भाधीन क्रमांक (१) येथील शासन परिपत्रकान्वये सदर मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी ३६ सहायक अनुदाने (वेतन) याखाली रु.१९.८९ लाख इतका निधी अर्थसंकल्प वितरण प्रणाली (बीम्स) वर वितरणासाठी उपलब्ध आहे.

आता संदर्भाधीन क्रमांक (२) येथील पत्रान्वये संस्थेने निधीची मागणी केली आहे त्यानुसार ३६ सहायक अनुदाने (वेतन) यावरील खर्च भागविण्यासाठी मंजूर तरतूदीपैकी आवश्यक इतका निधी वितरीत करण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरीता मागणी क्र : ए-४, प्रधानलेखाशीर्ष २०७०, सहायक अनुदान (अनिवार्य) (२०७० ०७५५) याखाली ३६ सहायक अनुदाने (वेतन) करिता रुपये २२१.१० लाख असे एकूण रुपये २३५.८० लाख (रुपये दोन कोटी पस्तीस लाख ऐंशी हजार ) इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आली आहे. सदर मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीपैकी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर (बीम्स) उपलब्ध असलेल्या निधीतून संस्थेस ३६ सहायक अनुदाने (वेतन) करिता रु.१८,००,०००/- (रुपये अठरा लाख) इतका निधी मंजूर करण्यात येत आहे.

**२.** सदर खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता मागणी क्रमांक : ए-४ मुख्य लेखाशीर्ष " २०७०-इतर प्रशासनिक सेवा-००३ प्रशिक्षण (००)(०८) डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस सहायक अनुदान (अनिवार्य) लेखाशिर्ष (२०७० ०७५५), ३६ सहायक अनुदाने (वेतन)" या खाली मंजूर तरतूदीतून रु.१८,००,०००/- याप्रमाणे भागविण्यात यावा.

**(कृ.मा.प.)**

३. सदरहू मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम संबंधित कोषागारातून काढण्यात आल्यानंतर महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी तसेच सहायक अनुदाने (वेतन) याखाली झालेल्या खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे, आणि संस्थेने आर्थिक वर्ष २०२५-२६ मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सीमित ठेवावा.

४. डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) अधिनियम २०२५, वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०७ एप्रिल, २०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार मुद्दा क्र.८ व ९ मधील अटींची पूर्तता होत आहे

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४१५१६५८३७२६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMRATA
SHASHANK
BHARSAKHALE

Digitally signed by NAMRATA SHASHANK BHARSAKHALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=afc239a04f8765fdfaff5b427895a52f52390a276568759df519aea12578512c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E7A55E217A5A7B81D43819C528413DCC573FB455C923C289F62184B4155ED280, cn=NAMRATA SHASHANK BHARSAKHALE
Date: 2025.04.15 16:59:47 +05'30'

**( नम्रता भारसाखळे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) संचालक, डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती
(२) विभागीय आयुक्त, अमरावती
(३) उप संचालक, लेखा व कोषागारे, अमरावती
(४) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
(५) उप कोषागार कार्यालय, अमरावती
(६) महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई
(७) महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
(८) वित्त विभाग (व्यय-४/अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई
(९) अ.मु.स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
(१०)निवड नस्ती (सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-प्रशि-४(१२अ)